केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमातंर्गत (PMJVK) लातूर जिल्हयातील नगरपरिषद,उदगिर येथे सद्भाव मंडप/CSC बांधकामासाठी अनुदान वितरीत करण्याबाबत (केंद्र हिस्सा+राज्य हिस्सा) सन २०२४-२५

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः** अविवि-२०१८/प्र.क्र.९२/का.७,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय,मुंबई - ४०० ०३२
दिनांक: - २९ मार्च, २०२५

**संदर्भ:** -

१. अवर सचिव, अल्पसंख्याक कार्य मंत्रालय,भारत सरकार,नवी दिल्ली यांचे पत्र क्र. MsDP-१३/४७/२०९८-MsDP-MOMA(Part), दि २१/०८/२०१९.
२. शासन ज्ञापन, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र. अ.वि.वि. -२०१८ /प्र.क्र.९२ / का-७, दि. १९ /०९ /२०१९.
३. शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र. अ.वि.वि.-२०१८ /प्र.क्र.९२ / का-७, दि. १९ /०९/२०१९.
४. शासन निर्णय,अल्पसंख्याक विकास विभाग, क्र. अ.वि.वि.-२०१८ /प्र.क्र.९२ / का-७, दि.०४/०२/२०२१.
५. जिल्हाधिकारी, लातूर यांचे पत्र क्र. जा.क्र. २०२४-२५/ अल्पसंख्याक / PMJVK /का-६/ ५५, दि. ०८/०१/२०२५

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाच्या अल्पसंख्याक कार्य मंत्रालयाच्या प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमातंर्गत (PMJVK) राज्यातील उदगीर,जि.लातूर येथे अल्पसंख्याकांसाठी सदभाव मंडप/CSC बांधकामाचा रु.१४६.३६ लाख इतका प्रस्ताव मा.मुख्य सचिव,यांच्या अध्यक्षतेखालील राज्यस्तरीय संनियंत्रण समितीच्या सहमतीने केंद्र शासनास पाठविण्यात आला होता.

२. केंद्र शासनाच्या अल्पसंख्याक कार्य मंत्रालयाच्या गठित शक्तिप्रदान समितीने दि.१७/०७/२०१९ रोजी झालेल्या १६ व्या बैठकीत प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमातंर्गत (PMJVK) लातूर जिल्हयातील उदगिर येथे अल्पसंख्याकांसाठी सदभाव मंडप/CSC बांधकामासाठी एकूण रु.१४०.०० लाख इतक्या रकमेच्या प्रस्तावास मान्यता दिली असल्याचे संदर्भ क्र. (१) अन्वये कळविले आहे. सदर प्रस्तावास केंद्र : राज्य हिस्सा हा ६०:४० इतका आहे.

३. संदर्भ क्र. (४) अन्वये विभागाच्या शासन निर्णयानुसार PMJVK अंतर्गत लातूर जिल्हयातील उदगिर येथे अल्पसंख्याकांसाठी सद्भाव मंडप/CSC बांधकामाकरीता केंद्र हिश्श्यातील रू.२५.२०/- लाख तसेच राज्य हिश्श्यातील रू.१६.८० /- लाख असा एकूण रू.४२.०० /- लाख ( केंद्र + राज्य ) इतका निधी जिल्हाधिकारी, लातूर यांना यापुर्वी वितरीत करण्यात आलेला आहे.

४.	संदर्भ क्र. (५) अन्वये जिल्हाधिकारी, लातूर यांनी विनंती केल्यानुसार, केंद्र पुरस्कृत प्रधान मंत्री जनविकास कार्यक्रम अंतर्गत लातूर जिल्हयातील उदगिर येथे अल्पसंख्याकांसाठी सद्भाव मंडप/CSC बांधकामाकरीता दुसऱ्या टप्प्यातील केंद्र हिश्श्यातील रू.२५.२०/- लाख व राज्य हिश्श्यातील रू.१६.८०/- लाख असा केंद्र व राज्य हिश्श्यातील एकूण रू.४२.००/- लाख इतका निधी योजनेच्या SNA खात्यामध्ये उपलब्ध असलेल्या निधीमधून जिल्हाधिकारी, लातूर यांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

केंद्र पुरस्कृत प्रधान मंत्री जनविकास कार्यक्रम अंतर्गत लातूर जिल्हयातील उदगिर येथे अल्पसंख्याकांसाठी सद्भाव मंडप/CSC बांधकामाकरीता केंद्र हिश्श्यातील रू.२५.२०/- लाख व राज्य हिश्श्यातील रू.१६.८०/- लाख असा केंद्र व राज्य हिश्श्यातील एकूण रू.४२.००/- लाख इतका निधी योजनेच्या SNA खात्यामध्ये उपलब्ध असलेल्या निधीमधून जिल्हाधिकारी, लातूर यांना खालील तक्त्यातील स्तंभ क्र (७) व (८) प्रमाणे मंजूर करून PFMS प्रणालीव्दारे वितरीत करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

**(रू.लाखात)**

| प्रकल्पाचे नाव | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा | एकूण किंमत | दि. ०४/०२/२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये वितरीत निधी | | वितरीत करावयाचा निधी | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| सदभाव मंडप बांधकाम, उदगीर, जि. लातूर | ८४ | ५६ | १४० | २५.२ | १६.८ | २५.२ | १६.८ |
| Total | **८४** | **५६** | **१४०** | **२५.२** | **१६.८** | **२५.२** | **१६.८** |

२.	केंद्र व राज्य शासनाकडून केंद्र पुरस्कृत योजनांच्या निधीचे परिणामकारक व्यवस्थापन करण्याच्या तसेच निधी विनियोगामध्ये अधिक परिणामकारकता आणण्याच्या दृष्टीने केंद्र शासनाच्या सार्वजनिक वित्तीय प्रणाली (PFMS) व्दारे निधी वितरीत करण्यास सुरूवात करण्यात आली आहे. त्यानुषंगाने

- प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रम ही केंद्र पुरस्कृत योजना असून PFMS प्रणालीच्या सुधारीत कार्यपध्दतीनुसार प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रम या योजनकरीता Single Nodal Agency **म्हणून अवर सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय** यांची नियुक्ती करण्यात आली आहे.
- तसेच सदर योजनेचे SNA खाते स्टेट बँक ऑफ इंडिया, मंत्रालय शाखा येथे उघडण्यात आले आहे. सदर योजना PFMS प्रणालीवर Map करण्यात आली आहे.

३. सन २०२४-२५ या वर्षात प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमांतर्गत अल्पसंख्याक बहुल क्षेत्रातील प्रकल्प राबविण्यासाठी केंद्र शासनाकडून विविध कामांना वितरीत केलेला व त्यासमरूप वितरीत करावयाचा राज्य हिश्श्यातील निधी योजनेच्या स्टेट बँक ऑफ इंडिया, मंत्रालय शाखा येथे उघडण्यात आलेल्या SNA खाते **क्र.४०५३३३४५६७८ व IFSC CODE - SBIN००६१५२४** खात्यावर जमा करण्यात आला आहे.

४. जमा करण्यात आलेल्या योजनेच्या SNA खात्यामधून उपरोक्त तक्त्यातील स्तंभ क्र. (७) व (८) प्रमाणे मंजूर करण्यात आलेला केंद्र व राज्य हिश्श्यातील रू.४२/- लाख इतका निधी PFMS प्रणालीव्दारे लातूर जिल्हयातील उदगिर येथे अल्पसंख्याकांसाठी सद्भाव मंडप/CSC बांधकामाकरीता जिल्हाधिकारी, लातूर यांना वितरीत करण्यात येत आहे. याकरिता ते आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील. जिल्हाधिकारी, लातूर यांनी PFMS प्रणालीव्दारेच सदर रक्कम विकासकामांच्या अंमलबजावणीशी संबंधित अंमलबजावणी यंत्रणेस रितसर वितरित करावी.

५. सदरचा खर्च करण्यास वित्तीय अधिकारांच्या मर्यादित.C.V.C च्या मार्गदर्शक तत्वानुसार / CAG या निर्देशानुसार कोणताही शासन निर्णय / अटी व शर्तीचा भंग होणार नाही, याची दक्षता संबंधितांनी घ्यावी. सदर रक्कम वितरित करण्यापूर्वी संबंधित अंमलबजावणी अधिकारी यानी शासनाने यासंदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय / कार्यालयीन आदेश / वित्तीय नियमावली / सार्वजनिक बांधकाम विभागाची कार्यनियमावली / भारताचे नियंत्रक व महालेखापरीक्षक यांचे निरिक्षण अहवाल / वित्तीय कार्यपध्दती यांचा अवलंब करावा. तसेच सदर रक्कम चालू आर्थिक वर्षात उपयोगात आणणे आवश्यक राहील.

६. जिल्हाधिकारी, लातूर यांनी मान्यताप्राप्त विकासकामांच्या अमंलबजावणीसाठी उर्वरीत निधीची मागणी करताना यापुर्वी प्राप्त सर्व निधीच्या वापराबाबतची विहित नमुन्यातील उपयोगिता प्रमाणपत्रे (UC) तसेच त्रैमासिक अहवाल (QPR), अद्ययावत छायाचित्रांसह प्रस्तावासोबत शासनास सादर करावी. तसेच निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापाल कार्यालयास सादर करण्याची आणि महालेखापालांच्या लेख्याशी खर्चाचा ताळमेळ घालण्याची जबाबदारी जिल्हाधिकारी, लातूर यांची राहील.

७. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३. दि. १२ एप्रिल, २०२३ व २५ जुलै, २०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकांरानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२५०३२९१४५६२५६११४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VISHAKHA SACHIN ADHAV

Digitally signed by VISHAKHA SACHIN ADHAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MINORITIES DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=b2ad90146c0c24582e5f69373fdb00dd8bff89e962d3f5d3bb153e589b39cc43, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=65EF4533476D0EA1DB9995A9B28EDC4173C3B94922081D293614536B5BEAD664, cn=VISHAKHA SACHIN ADHAV
Date: 2025.03.29 14:57:12 +05'30'

**(विशाखा आढाव)**
**उप सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. अप्पर मुख्य सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई

२. प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. विभागीय आयुक्त, छत्रपती संभाजीनगर
४. जिल्हाधिकारी,लातूर.
५. मुख्याधिकारी, नगर परिषद, उदगीर
६. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
७. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा व परीक्षा) मुंबई/नागपूर.
८. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, छत्रपती संभाजीनगर
९. अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नांदेड.
१०. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, लातूर.
११. जिल्हा कोषागार अधिकारी,लातूर.
१२. वित्त विभाग (अर्थसंकल्प -४/ व्यय -४) मंत्रालय, मुंबई.
१३. नियोजन विभाग (कार्या.१४७१)
१४. निवड नस्ती, (का.७)